**महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद (विद्या प्राधिकरण),पुणे( Maharashtra State Council For Educational Research And Training) (Academic Authority),Pune या संस्थेच्या नामाभिधान बदलाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मराशै- २०१९/प्र.क्र.९७/प्रशिक्षण**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई- ४०००३२,
दिनांक: २९ नोव्हेंबर, २०१९

वाचा -

१) या विभागाचा शासन निर्णय क्रमांकः डायट-४५१६/प्र.क्र.४०/१६)/प्रशिक्षण, दिनांक : १७ ऑक्टोबर, २०१६
२) या विभागाचा शासन निर्णय क्र. डायट-४५१७/(प्र.क्र.८४/२०१७)/प्रशिक्षण, दिनांक २४ ऑगस्ट, २०१७
३) या विभागाचा शासन निर्णय क्र. डायट-४५१७/प्र.क्र.८४/२०१७/ प्रशिक्षण, दिनांक ०१ जून, २०१८
४) या विभागाचे शासन शुध्दीपत्रक क्रमांकः डायट- ४५१७/प्र.क्र.८४/२०१७/प्रशिक्षण, दिनांक ३० जून,२०१८

प्रस्तावनाः-

दिनांक १७ ऑक्टोंबर, २०१६ च्या शासन निर्णयानुसार महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे या संस्थेस विद्या प्राधिकरण असे संबोधण्यात येऊन प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र या योजनेंतर्गत विद्या प्राधिकरणाची पुनर्रचना करण्यात आली. दिनांक २४ऑगस्ट, २०१७ रोजीच्या शासन निर्णयानुसार विद्या प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य , पुणे या संस्थेचे नामकरण महाराष्ट्र विद्या प्राधिकरण,पुणे (Maharashtra Academic Authority, Pune)असे करण्यात आले.

मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ (Right to Education Act) मधील कलम २९(१) अंतर्गत खालीलप्रमाणे तरतुद आहे:-

२९ (१) The Curriculum and the evaluation procedure for elementary education shall be laid down by an academic authority to be specified by the appropriate Goverment, by notification.

सदर कलमाचा अयोग्य अर्थ लावून दिनांक १ जून, २०१८ रोजीच्या शासन निर्णयानुसार महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद (विद्या प्राधिकरण ), पुणे व इंग्रजी मध्ये Maharashtra State Council For Education Research & Training (Academic Authority), Pune असे संबोधण्यात आले. दिनांक ३० जून, २०१८ च्या शासन निर्णयानुसार वरील Education या शब्दाऐवजी Educational असा योग्य बदल करण्यात आला. **वास्तविक, वरील कलमानुसार महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद करीत असलेल्या कामासाठी एखादी संस्था Academic Authority म्हणून नियुक्त करणे अपेक्षित होते.**

याअनुषंगाने केंद्र शासनाच्या दि.२७/०२/२०१८ रोजीच्या पत्रातील सूचना खालीलप्रमाणे आहेः-

SCERTs need to have a common nomenclature

Different states follow different nomenclature for similar responsibility driven organisations- for e.g. SIE, SCERT, DTERT, Academic Authorities etc. It is recommended that all States follow a uniform nomenclature going forward- called the State Council for Educational Research and Training-SCERT.Each State can add the State name after,for e.g. State Council for Educational Research and Training,Assam.

उपरोक्त सर्व बाबींचा यथायोग्य विचार करून शासनाने वरील संदर्भाधीन सर्व शासन निर्णय व शासन शुद्धिपत्रकान्वये करण्यात आलेले नावातील बदल रद्द करून खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय -**

महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद या संस्थेचे मराठी भाषेत नाव," राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र" व इंग्रजी भाषेत "State Council for Educational Research and Training, Maharashtra" असे करण्यात येत आहे.

यापुढे, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद या संस्थेचे सर्व व्यवहार वरील नामाभिधानानेच करण्यात यावेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९११२९१६४६०१५४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2019.11.29 17:22:18 +05'30'

**( राजेंद्र पवार )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रतः-**

१) मा. मुख्यमंत्री
२) मा. मंत्री शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग मंत्रालय, मुंबई
४) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
६) महालेखापाल (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
७) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
८) सह सचिव /उपसचिव / शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
९) शिक्षण संचालक, (प्राथमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

१०) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य पुणे
११) संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र (महाराष्ट्र विद्या प्राधिकरण), पुणे
१२) संचालक, महाराष्ट्र राज्य पाठयपुसतक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, बालभारती, पुणे
१३) संचालक, प्रौढ व अल्पसंख्याक संचालनालय, महाराष्ट्र राज्य पुणे.
१४) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, बालचित्रवाणी शेजारी, आगरकर रिसर्च इन्स्टिटयूटच्य मागे, भांबुर्डा, शिवाजी नगर, पुणे.
१५) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद, पुणे.
१६) जिल्हाधिकारी (सर्व)
१७) आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
१८) मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद (सर्व)
१९) संचालक, महाराष्ट्र शैक्षणिक नियोजन व प्रशासन संस्था औरंगाबाद.
२०) प्रादेशिक विद्या प्राधिकरण, नागपूर, अमरावती, औरंगाबाद, नाशिक, मुंबई
२१) विभागीय शिक्षण उपसंचालक (सर्व विभाग)
२२) प्राचार्य, जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था (सर्व)
२३) शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक / निरंतर ), जिल्हा परिषद (सर्व)
२४) शिक्षण निरीक्षक, (दक्षिण / उत्तर / पश्चिम), बृहन्मुंबई
२५) शिक्षण प्रमुख / शिक्षणाधिकारी/ प्रशासन अधिकारी, महानगरपालिका (सर्व)
२६) संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय
२७) जिल्हा कोषागार अधिकारी ( सर्व )
२८) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
२९) निवड नस्ती (प्रशिक्षण)